**भाषा संचालनालयामधील सहायक भाषा संचालक (प्रशिक्षण व आस्थापना), गट-ब (राजपत्रित) या पदावर पदोन्नती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
शासन आदेश क्रमांक:- **भासंप-२०२१/प्र.क्र.८५/आस्था-२**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ६ मार्च, २०२३

**शासन आदेश :-**

भाषा संचालनालयामधील अधीक्षक, गट-ब (अराजपत्रित) या पदावर कार्यरत असलेले श्री. चिं. हो. वसावे यांना सातव्या वेतन आयोगानुसार अनुज्ञेय असलेल्या एस-१५ : रु. ४१८००-१३२३०० या वेतनमानातील सहायक भाषा संचालक (प्रशिक्षण व आस्थापना) या संवर्गातील रिक्त असलेल्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे. श्री. वसावे यांची सहायक भाषा संचालक (प्रशिक्षण व आस्थापना) या पदावरील पदस्थापना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे -

| अ.क्र. | अधिकारी/कर्मचाऱ्याचे नाव व पद | पदोन्नतीनंतर पदस्थापना |
|---|---|---|
| १. | श्री. चिं. हो. वसावे, अधीक्षक | सहायक भाषा संचालक (प्रशिक्षण व आस्थापना), भाषा संचालनालय (मुख्यालय), मुंबई |

२. **सदर पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधीन देण्यात येत आहे :-**

१) सदर पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील निकालाच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि. २५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-ब च्या दि. ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार देण्यात येत आहे. तसेच, दि. ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णय प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हाने देण्यात आले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

२) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात राहील.

३) निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

४) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५) सदरची पदोन्नती ही त्यांच्याविरुद्ध कोणतीही विभागीय चौकशी/फौजदारी कार्यवाही सुरु नाही, या धारणेच्या अधीन देण्यात येत आहे.

६) निवडसूचीतील अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषांची पूर्तता केली आहे या अटीच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

७) सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या तथापि, पदोन्नती नाकारलेल्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात भाषा संचालनालयाने सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करावी.

८) सदरची पदोन्नती महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र. १०८६/२०१९ व याचिका क्र. ११२/२०२० मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**३.** संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी श्री. चिं. हो. वसावे यांना पदोन्नतीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. श्री. वसावे यांनी त्यांच्या पदोन्नतीच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे.

**४.** सदर आदेश शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**५.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०३०६१८२२३६७५३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJAY DHONDBARAO BHOSALE

Digitally signed by AJAY DHONDBARAO BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1da605d815512e5b0901a07f495f12959146d0936ce1aa35f9fa378e1a4d6a87, pseudonym=2C09EE78E36A33F8C497462301F1790AE4E0746A, serialNumber=BE88F3DC57FA6737970A6A01AEDFBFE6642BB00FC7B162A3142176A6FCCB21CD, cn=AJAY DHONDBARAO BHOSALE
Date: 2023.03.08 12:07:08 +05'30'

**(अ.धों. भोसले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१. श्री. चिं. हो. वसावे, अधीक्षक, भाषा संचालनालय, मुंबई (भाषा संचालनालयामार्फत)

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

२. महालेखापाल (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.
३. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (का-१२/का-१६-ब), मंत्रालय, मुंबई.
४. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. उप सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई
८. विभागीय सहायक भाषा संचालक, सर्व विभागीय कार्यालये (भाषा संचालनालयामार्फत)
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवडनस्ती (कार्यासन-आस्था-२)